**पशुसंवर्धन विभागाच्या प्रचार व प्रसिध्दीसाठी माध्यम आराखडयास मान्यता देणेबाबत..**

**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्र.मपवि-२०२४/प्र.क्र.१३/पदु-२**
मंत्रालय, मुंबई-४०००३२.
दिनांक : ०२ ऑगस्ट, २०२४

**वाचा :-** १. सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र. मावज-२०२१/प्र.क्र.१२६/का.-३४, दिनांक १३ ऑगस्ट, २०२१.

२. आयुक्त पशुसंवर्धन, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे क्र.विस्तार/प्र.क्र.२५४/जाहिरात आराखडा/ ७३७८/२०२४/पसं-१३, पुणे-६७, दिनांक २० जून २०२४ रोजीचे पत्र.

३. माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई यांचे क्र.वृत्तचित्र २०२४/ मा.आ. बैठका/का-७, दिनांक ०५ जुलै, २०२४ रोजीच्या बैठकीचे इतिवृत्त

**प्रस्तावना :-**

राज्यात पशुसंवर्धन विभागामार्फत राबविण्यात येणाऱ्या विविध योजना, शेतकरी, पशुपालक यांच्यापर्यंत पोहचविणे, अनुषंगिक प्रसिध्दी व प्रचार प्रभावीपणे करणे या उद्देशाकरिता माहिती व जनसंपर्क महासंचालनालयामार्फत जाहिरातीद्वारे प्रसार व प्रसिध्दी करुन प्रभावी अंमलबजावणी करण्याचे कार्य पशुसंवर्धन विभागाकडून करण्यात येते. त्यानुषंगाने, आयुक्त पशुसंवर्धन, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे कार्यालयामार्फत दिनांक २०.०६.२०२४ च्या पत्रान्वये रु.४,९५,९०,०००/- जाहिरातीच्या आराखडयाचा प्रस्ताव सादर केला होता. त्यानुसार, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मुंबई यांनी सन २०२४-२५ या आर्थिक वर्षात राज्यात पशुसंवर्धन विभागामार्फत राबविण्यात येणाऱ्या विविध योजना, शेतकरी, पशुपालक यांच्यापर्यंत पोहचविणे, अनुषंगिक प्रसिध्दी व प्रचार प्रभावीपणे करणे याकरिता जाहिरातीच्या जनजागृती करण्यासाठी रु.४,९२,६१,०००/- (अक्षरी चार कोटी ब्याण्णव लाख एकसष्ट हजार फक्त) इतक्या रकमेच्या जाहिरात माध्यम आराखडयास मान्यता दिली आहे.

सामान्य प्रशासन विभागाच्या दिनांक १३/०८/२०२१ रोजीच्या शासन निर्णयानुसार शासकीय जाहिराती वितरण धोरणाच्या अंमलबजावणीची कार्यपध्दती विहीत करण्यात आली आहे. त्यानुसार पशुसंवर्धन विभागाच्या प्रचार व प्रसिध्दीसाठी माहिती व जनसंपर्क महासंचालनालयाच्या माध्यम आराखडा नियोजन व अंमलबजवणी समितीच्या दिनांक ०५/०७/२०२४ रोजी झालेल्या बैठकीत मान्यता देण्यात आलेली आहे. सदर आराखडयास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्याबाबत शासन पुढील प्रमाणे निर्णय घेत आहे.

## शासन निर्णय :-

सन २०२४-२५ या आर्थिक वर्षांमध्ये राज्यात पशुसंवर्धन विभागामार्फत राबविण्यात येणाऱ्या विविध योजना, शेतकरी, पशुपालक यांच्यापर्यंत पोहचविणे, अनुषंगिक प्रसिध्दी व प्रचार प्रभावीपणे करणे यासाठी जाहिरात व प्रसिध्दीच्या माध्यमातून जनसामान्यांपर्यंत पोहचविणे या उद्देशाकरिता माहिती व जनसंपर्क महासंचालनालयाच्या माध्यम आराखडा नियोजन व अंमलबजवणी समितीच्या दिनांक ०५/०७/२०२४ रोजी झालेल्या बैठकीत मान्यता देण्यात आलेल्या माध्यम आराखडयास तसेच तो राबविण्यासाठी येणाऱ्या रु.४,९२,६१,०००/- (अक्षरी चार कोटी ब्याण्णव लाख एकसष्ट हजार फक्त) इतक्या खर्चास या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे. या प्रचार व प्रसिध्दी माध्यम आराखडयानुसार येणाऱ्या अंदाजीत खर्चाचा तपशील खालील प्रमाणे राहील :-

| | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| **माहिती व जनसंपर्क महासंचालनालय** | | | | | | | |
| **कृषि, पशुसंवर्धन व दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग प्रस्तावित माध्यम आराखडा** | | | | | | | |
| **क्र.** | **माध्यम** | **स्वरुप** | **तपशील** | **रक्कम (प्रती नग)** | **संख्या** | **एकूण अंदाजित रक्कम (सर्व करांसहित)** | **कार्यादेश निर्गमित करणारी शाखा** |
| १ | निर्मिती साहित्य (Production of Creative) | **टिव्हीसी** | TVC - ६० Sec. - As per DAVP rate | ७,००,००० | १० | ७०,००,००० | **वृत्तचित्र शाखा** |
| | | **जिंगल्स/ स्पॉट** | Audio Jingle (६० Sec.) | ४५,००० | १० | ४,५०,००० | **वृत्तचित्र शाखा** |
| | **Total - A** | | | | | **७४,५०,०००** | |
| **क्र.** | **Media** | **मूळ दर, प्रक्रिया** | **Details** | **वारंवारिता** | **संख्या/ दिवस** | **एकूण अंदाजित रक्कम (सर्व करांसहित)** | **कार्यादेश निर्गमित करणारी शाखा** |
| १ | दूरदर्शन | केंद्र सरकारचा दर | टिव्हीसीचे प्रसारण - सायं. ७.०० बातम्यांच्या पूर्वी व मध्यंतरात जाहिरात प्रसारण | नमूद अंदाजित रकमेच्या मर्यादेत | ३० दिवस | १०,००,००० | **वृत्तचित्र शाखा** |
| २ | मराठी वृत्त वाहिन्या | CBC (DAVP) यादीवरील व दर | ४५ ते ६० सेकंद जाहिरातींचे प्रसारण - प्रत्येक बँडमध्ये नमूद दराच्या मर्यादेत समसमान जाहिरात प्रसारण | नमूद अंदाजित रकमेच्या मर्यादेत | ३० दिवस | ६०,००,००० | **वृत्तचित्र शाखा** |
| ३ | आकाशवाणी केंद्र | केंद्र सरकार दर | जिंगल्स / स्पॉटचे सकाळी ७.१० आणि सायंकाळी ७ वाजता बातम्यांच्या मध्यंतरात एक वेळा (केंद्र शासनाचे दर) | नमूद अंदाजित रकमेच्या मर्यादेत | ३० दिवस | ५,००,००० | **वृत्तचित्र शाखा** |
| ४ | सोशल मिडीया (Social Media) | विहित ई-निविदा प्रक्रियेद्वारे | शासन निर्णय दि. २३.११.२०२३ मधील संस्थांच्या सुचीमधील संस्थांमार्फत विहीत कार्यपद्धतीचे अवलंब करुन प्रसिद्धी करणे शक्य होईल. या माध्यमांच्या संस्थेनी निविदेमध्ये नमूद केलेल्या दराने प्रसिद्धी करण्याचे प्रस्तावित | नमूद अंदाजित रकमेच्या मर्यादेत | ३० दिवस | ६०,००,००० | **समाज माध्यम शाखा** |
| ५ | एसटी बस डेपोतील सार्वजनिक उद्घोषणा | CBC (DAVP) दर | राज्यातील ग्रामीण भागातील बसस्थानकावरुन ऑडिओ जिंगलचे प्रसारण | नमूद अंदाजित रकमेच्या मर्यादेत | ३० दिवस | ४०,००,००० | **वृत्तचित्र शाखा** |
| ६ | एसटी डेपातील LCD/LED/ESB स्क्रीन | CBC (DAVP) यादीवरील व दर | एस.टी. महामंडळाच्या बस डेपोतील इलेक्ट्रॉनिक साईन बोर्ड / एलईडी स्क्रीनवरुन प्रसिद्धी (या माध्यमास एकाधिकार (Sole Rights) उपलब्ध आहेत. तथापि, दि.१८ | अंदाजित रकमेच्या मर्यादेत | ३० दिवस | ५०,००,००० | **प्रदर्शने शाखा** |
| ७ | खाजगी होर्डिंग्ज | CBC (DAVP) यादीवरील व दर | भाडे तत्वावरील खाजगी होर्डिंग्ज As per Availability | अंदाजित रकमेच्या मर्यादेत | ३० दिवस | ९५,००,००० | **प्रदर्शने शाखा** |
| ८ | लोकराज्यच्या माध्यमातून जनजागृती | | | | | १०,००,००० | **प्रकाशने शाखा** |
| | | | | | **Total - B** | **३,३०,००,०००** | |
| | | | | | **TOTAL (A + B)** | **४,०४,५०,०००** | |
| १ | शा.नि. दि. १३.८.२०२१ नुसार रु.५.०० कोटी इतक्या रकमेपर्यंतच्या प्रसिद्धी आराखड्यासाठी एकूण खर्चाच्या ४% (रु.२० लाख) आणि त्यापेक्षा प्रत्येक वाढीव रकमेसाठी २% (उर्वरित रकमेवर (रु.५ कोटी वजाजाता)) प्रमाणे | शासन निर्णय तरतुदीनुसार | माहिती व जनसंपर्क महासंचालनालयाला येणारा कार्यालयीन उपकरणावरील खर्च, सॉफ्टअवेर, तात्पुरता मनुष्यबळावरील खर्च, संशोधन खर्च, वाहतूक खर्च, इतर किरकोळ खर्च | | | १६,१८,००० | |
| | | | | | **TOTAL EXPENDITURE** | **४,२०,६८,०००** | |
| | **विभागस्तरावर करावयाची कार्यवाही** | | | | | | |
| १ | पशुधन ऐश्वर्य या वार्षिक नियतकालिकाच्या अंक ८ ची छपाई करणे | विहित कार्यपद्धतीचा अवलंब | पशुसंवर्धन विषयक विविध लेख, यशोगाथा, नवनवीन संशोधने, यांची माहिती क्षेत्रीय स्तरावरील अधिकारी, कर्मचारी व पशुपालक यांना पशुधन ऐश्वर्य या नियतकालिकाच्या स्वरुपात उपलब्ध करुन देणे. | रुपये १६० प्रती अंक X ६५५० प्रती | | १०,४८,००० | विभागस्तरावर कार्यवाही करण्यात येणार आहे. तथापि, माध्यमांच्या रकमेमध्ये फेरबदल करण्याचे अधिकार संबंधित विभागाला असतील, असे उपस्थित संबंधित विभागाच्या अधिकारी यांनी सांगितले. |
| २ | घडीपत्रिका, पाम्प्लेटची छपाई करणे | विहित कार्यपद्धतीचा अवलंब | पशुसंवर्धन विभागाच्या योजना, उपयुक्त माहितीची जनजागृती व प्रचार करणेबाबत घडीपत्रिका, पाम्प्लेटची छपाई करणे (४३६००० प्रती X रु.१.२५ प्रती घडीपत्रिका / पाम्प्लेट) | | | ५,४५,००० | |
| ३ | मिडीया टिम तयार करणे आयुक्त, पशुसंवर्धन व दुग्धव्यवसाय यांच्या स्तरावर प्रचार प्रसिद्धीची माहिती तयार करण्यासाठी सोशल मिडिया टीम तयार करणे | विहित कार्यपद्धतीचा अवलंब | पशुसंवर्धन विषयक योजना, कार्यक्रम, इतर उपक्रम व अनुभव यांची जनजागृती, प्रचार व प्रसिद्धी कार्य प्रभावीपणे पूर्ण करण्यासाठी विभागाचा विस्तार कक्ष स्थापन करणे, या कक्षाद्वारे प्रचार व प्रसिद्धी करण्याकरिता आवश्यकतेनुसार टेम्प्लेट तसेच जाहिरात व माहितीपर व्हिडिओ, जिंगल्स तयार करणे व विभागाच्या सोशल मिडीया पेज तसेच वेबसाईटवर प्रसिद्ध करणे. | प्रतिमाह अंदाजे रु.७ लक्ष रुपये प्रमाणे पुढील ८ महिन्यांकरिता | | ५६,००,००० | |
| | | | | | **TOTAL EXPENDITURE** | **४,९२,६१,०००** | |

२. सदर देयकांचा खर्च लेखाशिर्ष मागणी क्र. डी ४, २४०३ पशुसंवर्धन, (००) (१०) प्रदर्शन व प्रचार (१०० टक्के राज्य योजना) (कार्यक्रम), २६- जाहिरात व प्रसिध्दी (२४०३ ०८७५) या उद्दिष्टासाठी आणि केंद्र पुरस्कृत योजनां (NADCP, BCP, PPRCP, CSF, ASCAD) मधील प्रसिध्दी व प्रचार या बाबीखाली सन २०२४-२५ करिता मंजूर करण्यात आलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

३. माहिती व जनसंपर्क महासंचालनालयाने यानुषंगाने संबधित जाहिरात एजन्सी/आस्थापनांना कार्यादेश देण्याबाबत पुढील कार्यवाही करावी. तसेच सन २०२४-२५ मध्ये प्रचार व प्रसिध्दी कार्यक्रम राबविण्यासाठी सहआयुक्त, पशुसंवर्धन (मुख्यालय) यांना कार्यक्रमाचे कार्यान्वयन तसेच संनियंत्रण करण्यासाठी प्राधिकृत करण्यात येत आहे. त्यानुषंगाने विषयांकित देयके आयुक्त, पशुसंवर्धन यांच्या कार्यालयाकडे थेट सादर करण्यात यावीत. सहआयुक्त, पशुसंवर्धन (मुख्यालय) यांनी प्रस्तुत कार्यक्रम राबविण्याबाबतचा अहवाल शासनास सादर करावा.

४. प्रस्तुत प्रचार व प्रध्दिती कार्यक्रम राबविण्यासाठी खर्च करतांना शासनाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या शासन निर्णय/ आदेश/परिपत्रके यानुसार तसेच वित्त विभाग, शासन निर्णय क्र.विअप्र-२०१३/ प्र.क्र.३० / २०१३/विनियम, दिनांक १७ एप्रिल, २०१५ अन्वये निर्गमित नियम पुस्तिका १९७८ मधील तरतूदींचे/ अटी व शर्तीचे काटेकारपणे पालन करण्यात यावे.

५. आयुक्त पशुसंवर्धन, महाराष्ट्र राज्य,पुणे यांनी उपरोक्त नमूद देयकांबाबत कोणत्याही प्रकारचा विलंब न करता सदर देयके सन २०२४-२५ या चालू आर्थिक वर्षांत देय होतील याची दक्षता घ्यावी.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्र. २०२४०८०२१७२२०६८५०१ असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात आला आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

NIWRUTTI BHAGUJI MARALE

Digitally signed by NIWRUTTI BHAGUJI MARALE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPARTMENT, 2.5.4.20=8a75c414ff50ce35220c63cd53d2eb1a99a474c02300beea74bb051c4c3c90a9, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=5C891DA87D2A4842558454524CC114BA5B2F67A2A80796592830D345500F15CC, cn=NIWRUTTI BHAGUJI MARALE
Date: 2024.08.02 17:37:22 +05'30'

**( नि. भा. मराळे )**

**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा.राज्यपाल, महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.

२) मा.मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे अपर मुख्य सचिव, मुख्यमंत्री सचिवालय, मंत्रालय, मुंबई.

३) मा.उप मुख्यमंत्री (वित्त), महाराष्ट्र राज्य यांचे अपर मुख्य सचिव, उप मुख्यमंत्री सचिवालय, मंत्रालय, मुंबई.

४) मा.उप मुख्यमंत्री (गृह), महाराष्ट्र राज्य यांचे अपर मुख्य सचिव, उप मुख्यमंत्री सचिवालय, मंत्रालय, मुंबई.

५) मा.सर्व मंत्री/राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.

६) मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.

७) मा.महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मुंबई.

८) आयुक्त पशुसंवर्धन, महाराष्ट्र राज्य, पशुसंवर्धन आयुक्तालय, औंध, पुणे-६७

९) महालेखापाल -१/२, (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर.

१०) अधिदान व लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.

११) वरिष्ठ कोषागार अधिकारी, कोषागार कार्यालय,जि.पुणे.

१२) कक्ष अधिकारी/ अवर सचिव (पदु -१/३/४/१६), कृषि,पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग, मंत्रालय, मुंबई.

१३) निवडनस्ती (पदु-२)